**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजने अंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत. . .**
दिवंगत डॉ.चांदोबा दशरथ सूर्यवंशी, वैद्यकीय अधिकारी, गट अ

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मवैअ २०२०/प्र.क्र.३९८/सेवा-३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
दिनांक ०९ मार्च, २०२३.

**वाचा :**

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९.०९.२०१८
२) सहसंचालक (अ व प्र) आरोग्य सेवा,आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्र.संआसे २ब /डॉ.सुर्यवंशी/अ.नि.वेतन /जा.क्र.१६२/२० दिनाकं १७.०२.२०२०.
३) सहसंचालक (अ व प्र) आरोग्य सेवा,आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे २ब/ डॉ. सुर्यवंशी/अ. नि.वेतन /जा.क्र.६६०/२१ दिनाकं २२.०६.२०२१.
४) श्रीमती सुषमा चांदोबा सूर्यवंशी यांचा दि.०४.०३.२०२१ रोजीचा अर्ज.

**शासन आदेश :**

उपरोक्त वाचा क्र.२ व ३ अन्वये सहसंचालक (अ व प्र) आरोग्य सेवा,आयुक्तालय, मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती सुषमा चांदोबा सूर्यवंशी यांच्या उपरोक्त वाचा क्र.४ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना वाचा क्र.१ येथील वित्त विभाग शासन निर्णय क्र अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार दिवंगत डॉ. चांदोबा दशरथ सूर्यवंशी, वैद्यकीय अधिकारी, गट-अ प्राथमिक आरोग्य केंद्र, इंदोरा जि. गोंदिया यांच्या नामनिर्देशित व्यक्ती / कायदेशीर वारसास म्हणजे त्यांच्या पत्नीस नामे श्रीमती सुषमा चांदोबा सूर्यवंशी यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर “सानुग्रह अनुदान” शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दि.२८.०८.२०१४ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदरचा खर्च मागणी क्र. जी-६-२०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी १०३ अनुकंपा भत्ते (००)(०६)-परिभाषित अंशदान /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन आदेश वरील वाचा क्र.१ येथील शासन निर्णयातील अ.क्र.५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०३१६०३१८३३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, pseudonym=B459C42CF5ECF9E88B3EDB04BD5126A3A7687178, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2023.03.09 17:22:34 +05'30'

**(अ.स.जाधव)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त तथा अभियान संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई.
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ ,नागपूर.
४) संबंधित अधिदान व लेखा अधिकारी /कोषागार अधिकारी
५) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, गोंदिया.
६) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.
७) श्रीमती सुषमा चांदोबा सूर्यवंशी, संत रविदास वार्ड , तिरोडा, ता. तिरोडा, जि.गोंदिया यांना माहितीस्तव
८) निवड नस्ती (सेवा-३)